**पोलीस आयुक्त, पिंपरी चिंचवड यांच्या आस्थापनेवर "अपर पोलीस आयुक्त" श्रेणीतील एक व "पोलीस उप आयुक्त" श्रेणीतील दोन पदे, अशी एकूण तीन पदे निर्माण करण्यास मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**गृह विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः अेपीओ-०८२१/प्र.क्र.५१/पोल-३**

मंत्रालय, दुसरा मजला, मुख्य इमारत,
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई
दिनांक : २८ जून, २०२३.

<u>वाचा</u> :-

१) गृह विभाग,शासन निर्णय क्र.अेपीओ-०८१६/प्र.क्र.१०३/पोल-३,दि.२८/०५/२०१८.

२) पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्र.पोमसं/२६-अ/४७/पोउपआ ३ पदे-पिंपरी चिंचवड/२२४/२०१८,दि.१५/०३/२०२१ .

३) उच्च स्तरीय सचिव समितीच्या दि.०६/०३/२०२३ रोजी पार पडलेल्या सन २०२३ मधील बैठकीचे इतिवृत्त.

४) मा. मंत्रिमंडळाची दिनांक २८ जून, २०२३ रोजी झालेली बैठक.

<u>प्रस्तावना</u> :-

गृह विभाग, शासन निर्णय दि.२८/०५/२०१८ च्या निर्णयाव्दारे पोलीस आयुक्त, पुणे शहर आणि पोलीस अधीक्षक, पुणे ग्रामीण कार्यक्षेत्राचे विभाजन करुन पोलीस आयुक्त,पिंपरी-चिंचवड निर्माण करण्यात आले आहे. या शासन निर्णयाव्दारे पोलीस आयुक्त, पिंपरी चिंचवड साठी अपर पोलीस आयुक्ताचे १ पद व पोलीस उप आयुक्तांची ३ पदे निर्माण करण्यास मान्यता देण्यात आली आहे.

२. परंतु पिंपरी चिंचवड शहरात गुन्ह्यांत होणारी वाढ लक्षात घेऊन कायदा व सुव्यवस्था अबाधित राखण्यासाठी १-अपर पोलीस आयुक्त व २-पोलीस उप आयुक्त दर्जाच्या अधिकाऱ्यांची अशी अतिरिक्त एकूण ३ पदे निर्माण करणेबाबतची शिफारस पोलीस महासंचालक कार्यालयाने संदर्भाधीन क्र.२ च्या पत्राव्दारे शासनास केली आहे.

३. त्यानुषंगाने उक्त संदर्भ क्र.३ येथील दि.०६/०३/२०२३ रोजी मा.मुख्य सचिव,महाराष्ट्र राज्य,मुंबई यांचे अध्यक्षतेखाली पार पडलेल्या उच्च स्तरीय सचिव समितीच्या बैठकीच्या इतिवृत्तानुसार समितीने दिलेली मान्यता तसेच संदर्भ क्र.४ येथील दिनांक २८/०६/२०२३ रोजी मंत्रिमंडळ बैठकीत दिलेली मान्यता विचारात घेऊन, शासनाने याप्रकरणी खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

<u>शासन निर्णय</u>:-

पोलीस आयुक्त, पिंपरी चिंचवड यांच्या आस्थापनेवर "अपर पोलीस आयुक्त" यांचे ०१ व "पोलीस उप आयुक्त" यांची ०२ अशी एकूण तीन पदे निर्माण करण्यास खालीलप्रमाणे **तक्ता-अ नुसार** मान्यता देण्यात येत आहे.

**अ) नवीन निर्माण करावयाच्या ०३ पदांचा तपशील खालीलप्रमाणे आहेत.**

| अ.क्र. | पदनाम | वेतनश्रेणी | पदसंख्या |
|---|---|---|---|
| १ | अपर पोलीस आयुक्त | S-२९:१३११००-२१६६०० | ०१ |
| २ | पोलीस उप आयुक्त | S-२३:६७७००-२०८७०० | ०२ |
| **एकूण नियमित पदे** | | | **०३** |

२. उक्त **"तक्ता-अ"** येथील नमूद एकूण ०३ पदासांठी येणारा रू.७४,७९,३४० /-(रु. चौ-याहत्तर लाख एकोणऐंशी हजार तीनशे चाळीस फक्त) इतका वार्षिक आवर्ती खर्च व रू.५५,५४,२८८/- (अक्षरी रूपये पंच्चावन्न लाख चौपन्न हजार दोनशे अठ्ठयाऐंशी) एवढा अनावर्ती खर्च मंजूर अनुदानातून भागविण्यास मान्यता देण्यात येत आहे.

३. हा शासन निर्णय मा. मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखाली दि.०६/०३/२०२३ रोजी झालेल्या उच्च स्तरीय सचिव समितीने दिलेल्या मान्यतेनुसार तसेच दि.२८/०६/२०२३ रोजी मा. मंत्रिमंडळ बैठकीत झालेल्या निर्णयानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०६२८१९०२१८६२२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

KAILAS ARJUN GAIKWAD

Digitally signed by KAILAS ARJUN GAIKWAD
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT, 2.5.4.20=b31abfcb1894c4c597cc944f19a89f474e7b98a708cc03eb46cd241a604d42bb, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=47D160717AE29C2D2661B5275D8B9B4CFAE93893BE65A27853145A4C04D865CD, cn=KAILAS ARJUN GAIKWAD
Date: 2023.06.28 19:04:05 +05'30'

**( कैलास गायकवाड )**
**सह सचिव, गृह विभाग**

**प्रत,**

१. मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा.उपमुख्यमंत्री (गृह) यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. अपर मुख्य सचिव (गृह), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. अपर मुख्य सचिव (सेवा), साप्रवि, मंत्रालय, मुंबई.
५. अपर मुख्य सचिव (वित्त),वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
६. प्रधान सचिव (विशेष), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
८. पोलीस आयुक्त, पिंपरी चिंचवड आयुक्तालय, पुणे.
९. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
१०. जिल्हा कोषागार अधिकारी,मुंबई.
११. सह सचिव(पोल ३),गृह विभाग,मंत्रालय,मुंबई.
१२. अवर सचिव(पोल-३), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३. निवासी लेखा परीक्षा अधिकारी,वांद्रे,मुंबई.
१४. वित्त विभाग (व्यय-७)/वित्तिय सुधारणा-१/आ.पु.क.
१५. निवड नस्ती, पोल-३.